सन २०२१-२२ मधील अर्थसंकल्पित
तरतूदीचे वितरण करणेबाबत.
**डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजना (सर्वसाधारण) (२४२५१००९)-३३ अर्थसहाय्य**

# महाराष्ट्र शासन

## सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग

## शासन निर्णय क्र. अर्थसं ०६२१/प्र.क्र.७०/१८-स

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०८ ऑक्टोबर, २०२१.

**वाचा :-**

१. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय, क्रमांक सीसीआर ०६१२/प्र.क्र.२६९/२-स, दिनांक ०६/०९/२०१२.
२. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय, क्र. संकीर्ण ०५२१/प्र.क्र.६०/१८-स, दिनांक ११/०६/२०२१.
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा-प्रशा ५, दि. १०/०५/२०१६.
४. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र जा.क्र. कृषीपत-८/निधीमागणी/२०२१-२२/21 दिनांक १८/०६/२०२१.

**प्रस्तावना :-**

राज्यातील शेतकऱ्यांना सहकारी कृषी पत संस्थांमार्फत व्याज दरात वसुलीशी निगडीत प्रोत्साहनात्मक सवलत देण्याचा निर्णय शासनाने दिनांक २४/११/१९८८ च्या शासन निर्णयान्वये घेतला आहे. त्यानुसार दिनांक ०२/११/१९९१ च्या शासन निर्णयानुसार डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजना दिनांक ०१/०४/१९९० पासून पीक कर्ज घेतलेल्या शेतकऱ्यांना लागू करण्यात आली आहे. या योजनेअंतर्गत सहकारी कृषी पतसंस्थेकडून पीक कर्ज घेणाऱ्या व त्याची प्रतिवर्षी ३० जूनपर्यंत संपूर्ण परतफेड करणाऱ्या शेतकऱ्यांना व्याज सवलत देण्यात येत आहे. राष्ट्रीयकृत बँका, ग्रामीण बँका व खाजगी बँकांकडून कर्ज घेणाऱ्या शेतकऱ्यांनाही सदर योजना लागू आहे. मात्र थकीत कर्जास, तसेच, मध्यम मुदत व दीर्घ मुदत कर्जास सदरची योजना लागू नाही. या योजनेअंतर्गत शेतकऱ्यांना सहकारी कृषी पतसंस्थांमार्फत व बँकांमार्फत मिळणाऱ्या पीक कर्जावरील व्याज दराशी निगडीत व्याज सवलत देण्यात येत आहे. दिनांक ०३/१२/२०१२ रोजीच्या शासन निर्णयानुसार रूपये १.०० लाखापर्यंतच्या पीक कर्जावर वार्षिक ३% व त्यापुढील रूपये ३.०० लाखापर्यंतच्या पीक कर्जावर वार्षिक १% दराने व्याज सवलत लागू करण्यात आलेली होती. तसेच शासनाने दिनांक ११/०६/२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये रूपये ३.०० लाख मर्यादेपर्यंत अल्प मुदत पीक कर्ज घेऊन त्याची मुदतीत परतफेड करणाऱ्या शेतकऱ्यांना केंद्र शासनाचे ३% व्याज सवलत विचारात घेऊन सदर कर्ज शेतकऱ्यांना शुन्य टक्के (०%) दराने उपलब्ध होणार आहे.

राज्य शासनाच्या धोरणास अनुसरून डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजनेअंतर्गत रू. १०४००.०० लाख एवढी अर्थसंकल्पीय तरतूद सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी मंजूर आहे. त्यापैकी सदर योजनेसाठी अर्थसंकल्पीय तरतूदीच्या ६०% इतका निधी नियोजन व वित्त विभागाच्या

मान्यतेने वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुषंगाने रू. ६२४०.०० लाख निधी मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२१-२२ या वर्षात डॉ.पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजनेअंतर्गत (२४२५ १००९)-३३ अर्थसहाय्य खाली रू.१०४००.०० लाख वितरणासाठी उपलब्ध आहेत. त्यापैकी नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेने ६०% म्हणजेच रू. ६२४०.०० लाख (रूपये बासष्ट कोटी चाळीस लाख) एवढ्या निधीचे वितरण करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेला निधी संबंधित बँका / संस्थांस वितरीत करताना आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर रकमेबाबत उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त करून घ्यावे व त्याची प्रत शासनास सादर करावी.

३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा-प्रशा ५, दिनांक १०/०५/२०१६ अन्वयेच्या परिच्छेद “अ” नुसार या प्रकरणीची माहिती खालीलप्रमाणे आहे :-

(१) **विभागास प्रदान वित्तीय अधिकार** :- वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४/०६/२०२१ अन्वये उपरोक्त बाबीखालील ६० टक्के रक्कम नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेने खर्च करण्यास मंजूरी देण्यात आली असून सदर परिपत्रकातील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची सदर प्रकरणी पूर्तता होत आहे.

(२) **मंजूर निधी** :- या योजनेच्या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ या वित्तीय वर्षासाठी रूपये १०४००.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पीत झालेला आहे.

(३) मागील ३ महिन्यापूर्वी निधी वाटप करण्यात आलेले नाही. यास्तव दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला नाही.

(४) **ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षांतर्गत १ वर्षापासूनचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. :- या योजनेखाली देयकांची संक्षिप्त देयके पारीत होत नाहीत.**

(५) **स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देताना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यात आली आहे :- लागू नाही.**

(६) **वैयक्तिक लाभार्थीचे देयक सादर करताना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे :- या योजनेअंतर्गत बँका लाभार्थी आहेत.**

(७) **बांधकाम विषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देताना सक्षम अधिकाऱ्याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात करावा. :- लागू नाही.**

(८) **खरेदीविषयक प्रक्रिया अद्ययावत संबंधित शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा :- लागू नाही.**

४. सदर तरतूद संबंधित संस्थांना अदा करण्यासाठी V०००४-सहायक निबंधक (अर्थसंकल्प आणि नियोजन) आयुक्त, सहकार, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच लेखाधिकारी, अधिन सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी आहरण करून हा खर्च किती वेळेत होईल हे सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी पहावे. तसेच याबाबतचा अहवाल व विकास मंडळनिहाय खर्चाची माहिती वेळो वेळी शासनास पाठवावी.

७. सदरहू रक्कम मागणी क्र.व्ही - २ मुख्यलेखाशिर्ष " २४२५ सहकार - (१०७), सहकारी पत संस्थांना सहाय्य (०२) व्याजात सवलत (०२)(०४) डॉ.पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजना (कार्यक्रम) (दत्तमत) (२४२५१००९) ३३, अर्थसहाय्य ", या लेखाशिर्षाखालील सन २०२१-२२ या वर्षासाठी उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून सदर रक्कम खर्च करण्यात यावी.

८. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व त्यांचे अनौपचारिक संदर्भ क्र. अनौसंक्र २४९/१४३१, दि.२३.०७.२०२१ तसेच वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांचे अनौपचारीक संदर्भ क्र.अनौस ४१८/२०२१/व्यय-२, दि.१४.०९.२०२१ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११००८१११८२३२३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Shrikrushna Anandrao Wadekar

Digitally signed by Shrikrushna Anandrao Wadekar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7305071c9d8b281074f8452b1a671851b99ce164d8bd282bfeb775611d0eb87e, pseudonym=A9B19E68D73171B69896843593789CD99AC6DBD5, serialNumber=2711D1231BE138057C3C88E0EFB4B1CD5177AA9E3C71FCD2EDF6EC025114EB89, cn=Shrikrushna Anandrao Wadekar
Date: 2021.10.08 11:21:15 +05'30'

**( श्रीकृष्ण वाडेकर )**
विशेष कार्य अधिकारी तथा सह निबंधक स. सं.

**प्रत माहितीसाठी व योग्य त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित :-**

१. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. महालेखाकार, महाराष्ट्र- १, मुंबई.
५. महालेखाकार, महाराष्ट्र- २, नागपूर.
६. समन्वयक, राज्यस्तरीय बँकर्स समिती, पुणे.
७. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक, लि. मुंबई.
८. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था.
९. सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था.

१०. वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प-१३, मंत्रालय, मुंबई.
११. अवर सचिव (कार्या. १७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. कोषागार अधिकारी, पुणे.
१३. निवड नस्ती-१८-स.